**पिकांच्या आकडेवारीत सुधारणा करण्याची १०० टक्के केंद्र पुरस्कृत योजना सन २०२२-२३ मध्ये राज्यात राबविण्याकरीता प्रशासकीय मान्यता देण्याबाबत.**

**महाराष्ट्र शासन**
**कृषी, पशुसंवर्धन, दुग्धव्यवसाय विकास व मत्स्यव्यवसाय विभाग**
**शासन निर्णय क्रमांकः आयसीएस -२०२२/प्र.क्र.६०/११-अे**
मादाम कामा मार्ग, हुतात्मा राजगुरू चौक,
मंत्रालय (विस्तार), मुंबई-४०० ०३२.
तारीख: २३ मे, २०२२

वाचा -

१. शासन निर्णय, कृषि व पदुम विभाग क्र. पदसातत्य-२०२२/प्र.क्र.२२/११-अे, दि.२२.०२.२०२२
२. भारत सरकार, कृषि मंत्रालय, कृषि व सहकार विभाग यांचे पत्र NO. २-३/२०२२-ASI-ES, दि.०५.०५.२०२२.
३. कृषि आयुक्तालयाचे पत्र क्र. कृ.आ/सां-४/प्र.क्र.१०१२/ICS/२२-२३/१७५५६, दि.११.०५.२०२२.

प्रस्तावना -

पिकांच्या आकडेवारीत सुधारणा करण्याची १०० टक्के केंद्र पुरस्कृत योजना सन २०२२-२३ या आर्थिक वर्षासाठी राबविण्याकरिता केंद्र शासनाने संदर्भ क्र. २ च्या पत्रान्वये प्रशासकीय मान्यता दिलेली आहे.

२. पिकांच्या आकडेवारीत सुधारणा करण्याची योजना या १०० टक्के केंद्र पुरस्कृत योजनेतील २२ अस्थायी पदे दिनांक १ मार्च, २०२२ ते ३१ ऑगस्ट, २०२२ पर्यंत चालू ठेवण्यास संदर्भ क्र. १ येथील शासन निर्णयान्वये मान्यता देण्यात आलेली आहे. सदर योजनेस केंद्र शासनाने दिलेल्या प्रशासकिय मान्यतेस अनुसरून प्रशासकीय मान्यता देण्याकरिताचा प्रस्ताव कृषि आयुक्तालयाने संदर्भ क्र.३ च्या पत्रान्वये सादर केलेला आहे. त्या अनुषंगाने प्रस्तुत योजना सन २०२२-२३ मध्ये राज्यात राबविण्याकरीता प्रशासकीय मान्यता देण्याची बाब शासनाच्या विचाराधीन होती.

**शासन निर्णय :-**

पिकांच्या आकडेवारीत सुधारणा करण्याची योजना ही १०० टक्के केंद्र पुरस्कृत योजना सन २०२२-२३ या आर्थिक वर्षामध्ये राबविण्याकरिता केंद्र शासनाने दि.०५.०५.२०२२ च्या पत्रान्वये प्रशासकीय मान्यता दिलेली आहे. सबब, सदर योजना केंद्र शासनाच्या मार्गदर्शक सुचनांनुसार सन २०२२-२३ मध्ये राज्यात राबविण्याकरीता प्रशासकीय मान्यता देण्यात येत आहे.

२. प्रस्तुत योजनेच्या प्रयोजनार्थ सहाय्यक संचालक (लेखा-१), कृषि आयुक्तालय, महाराष्ट्र राज्य, पुणे- ५ यांना आहरण व संवितरण अधिकारी व आयुक्त (कृषि) यांना नियंत्रण अधिकारी म्हणून घोषित करण्यात येत आहे.

३. सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेताक २०२२०५२३१७३१५९८९०१ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने.

Digitally signed by Sarita Rishi Bandekar Deshmukh
Date: 2022.05.23 17:35:37 +05'30'

**( सरिता बांदेकर-देशमुख )**
**उप सचिव, महाराष्ट्र शासन**

**प्रति,**

१. प्रधान सचिव (कृषि) यांचे स्वीय सहाय्यक, कृषि व पदुम विभाग, मंत्रालय, मुंबई-४०० ०३२
२. आयुक्त (कृषि), कृषि आयुक्तालय, महाराष्ट्र राज्य, पुणे (५ प्रती)
३. कृषि संचालक (वि.प्र.), कृषि आयुक्तालय, महाराष्ट्र राज्य, पुणे-५
४. मुख्य सांख्यिक, कृषि आयुक्तालय, महाराष्ट्र राज्य, पुणे-५
५. सहाय्यक संचालक (लेखा-१), कृषि आयुक्तालय, महाराष्ट्र राज्य, पुणे-५
६. सहाय्यक संचालक (अर्थसंकल्प), कृषि आयुक्तालय, महाराष्ट्र राज्य, पुणे-५
७. महालेखापाल, (लेखा परिक्षा/लेखा व अनुज्ञेयता) महाराष्ट्र-१/२, मुंबई/नागपूर
८. संचालक, लेखा व कोषागारे, नवीन प्रशासन भवन, मंत्रालय, मुंबई- ४०० ०३२
९. जिल्हा कोषागार अधिकारी, पुणे
१०. वित्त विभाग (व्यय-१) / (अर्थसंकल्प-१३) / (अर्थोपाय), मंत्रालय, मुंबई-४०० ०३२
११. नियोजन विभाग (कार्यासन-१४३१), मंत्रालय, मुंबई-४०० ०३२
१२. उप सचिव (११-अे) यांचे स्वीय सहाय्यक, कृषि व पदुम विभाग, मंत्रालय, मुंबई-४०० ०३२
१३. कक्ष अधिकारी (२-अे), कृषि व पदुम विभाग, मंत्रालय, मुंबई-४०० ०३२
१४. निवड नस्ती, का.११-अे.